# सीझर चावेझ

मूळ लेखक: रुथ फ्रानचेर; चित्र: अर्ल थोल्लंडर;
मराठी अनुवाद: सुशील मेन्सन



आठवी इयत्ता उत्तीर्ण होईपर्यंत सीझर चावेझ कॅलिफोर्नियात तब्बल छत्तीस शाळांमध्ये शिकला. त्याचे आईवडील मेक्सिकन-अमेरिकन मजूर होते. ते पिकांच्या हंगामानुसार कॅलिफोर्नियातील शेतांमध्ये जाऊन काम करत. भरपूर कष्ट करुनही त्यांना तुटपुंजीच कमाई होई. कुटुंबियांच्या अन्न, वस्त्र आदी गरजा पूर्ण करण्यास ही कमाई अपुरी पडे.

तरूण चावेझला आपल्या मजुरांची हलाखीची अवस्था पाहून वाईट वाटे. त्याला त्यांची परिस्थिती सुधारण्याची तीव्र इच्छा होती. त्याने आपल्या सहकारी मजूरांना समजावले की आपण एकत्र येऊन प्रयत्न केले तर आपली गरीबी दूर होऊ शकेल. जेव्हा मजूर चांगल्या वेतनासाठी आंदोलन करण्यास तयार झाले तेव्हा सीझर चावेझने त्याचे नेतृत्व केले. त्याने ट्रकवाले, दुकानदार आणि इतर लोकांनाही या आंदोलनात सामील केले. आज सीझर चावेझचे नाव आणि त्याचे काम संपूर्ण अमेरिकेत प्रसिद्ध आहे.

लेखिका रुथ फ्रानचेरला सामाजिक प्रश्नांची सखोल जाण आहे. स्थलांतरित मजुरांविषयी तिला अनुकंपा वाटते. अमेरिकेसारखा समृद्ध समजला जाणारा देशसुद्धा अनेक क्षेत्रांत खूप गरीब आहे, हे आपल्याला या कथेतून दिसते.



अमेरिकेच्या ॲरिझोना राज्यातील युमा हा भाग अगदी रुक्ष वाळवंटासारखा आहे. तिथे दिवसा वातावरण खूप उष्ण असते. तेथील काटेरी पेअर आणि जोशुआ ही निवडुंगाची उंच झाडे उष्णतेच्या झळा सोसत शांत, स्थितप्रज्ञ उभी असतात.



याच भागात सीझर चावेझ आपले आईवडील आणि पाच भावंडे यांच्यासोबत राहात असे.

दहा वर्षांचा होईपर्यंत सीझर अनवाणी पायानेच तेथील मातीत फिरला, खेळला. अंगाला टोचणाऱ्या धुळीच्या तप्त कणांनी त्याला कणखर बनवले.



सीझरचे आजोबा मेक्सिकोतून अमेरिकेत आले होते. मेक्सिकोतील इतर स्थलांतरित मजुरांप्रमाणेच तेदेखील ॲरिझोनातील मुक्त जमिनीवर येऊन वसले होते.

आजोबांनी निवडुंगाची झाडे कापून, वालुकामय जमिनीला नांगरून छोटेसे शेत तयार केले होते. त्यात खरबूज, काळी मिरी, मका आणि धान्य यांची पेरणी केली होती. आपल्या या शेतात ते खूप मेहनत करत असत.



नंतर सीझरच्या आईवडिलांनी याच शेतात रात्रंदिवस कष्ट केले. घरातील मोठी भावंडे त्यांना शेतात मदत करत. सुरुवातीला सीझर आपल्या धाकट्या भावंडांसोबत घरीच राहात असे. पण वयाने थोडे वाढल्यावर तोसुद्धा शेतात मदत करण्यास जाऊ लागला. तो शेतातील तण उपटून काढण्याचे आणि शेताला पाणी देण्याचे काम करत असे.

सीझरचे कुटुंब पोटाची भूक भागवण्यासाठी शेती करत. शेतात जास्त पीक आले तर ते युमाच्या बाजारात जाऊन विकत. त्या कमाईतून ते काही कपडे खरेदी करत. तरीही कुटुंबातील काही मुलांना हिवाळ्यात अनवाणी पायांनी फिरावे लागे. रविवारी चर्चला जाताना त्यांच्या कुणाकडेही अंगात घालायला धड कपडे नसत.

सीझरच्या कुटुंबात सगळ्यांची त्वचा गडद होती आणि केस काळे होते. त्यांना फक्त स्पॅनिश भाषाच बोलता येई. ते अमेरिकेत जन्मले तरी त्यांना मेक्सिकन-अमेरिकन म्हणूनच ओळखले जाई.

सीझरला लहानपणी आईवडिलांच्या गप्पांतून अनेक घडामोडींची माहिती मिळे. त्याकाळात अमेरिका मोठ्या कठीण काळातून जात होती. युमातील कित्येक लोकांकडे भाजी खरेदी करण्याएवढाही पैसा नव्हता.

1937 साली सीझर दहा वर्षांचा असताना ॲरिझोना राज्यातील शेतकऱ्यांवर सरकारने एक नवीन कर बसवला. शेतकऱ्याने हा कर सरकारकडे जमा केला नाही तर त्याचे शेत सरकार जप्त करणार होती.

त्या वर्षी चावेझ कुटुंबाला कर भरण्याएवढे उत्पन्न मिळाले नाही. त्यामुळे आता आपल्याला आपले शेत सोडून दूर कुठेतरी जावे लागणार, हे त्याला आईवडिलांकडून कळले. आसपासच्या सगळ्या मजुरांची हीच परिस्थिती होती. शेवटचा उपाय म्हणून ते सारे मदत मागण्यासाठी पाद्रीकडे गेले. आपण इंग्रजी बोलू शकत नाही; पण पाद्री सरकारशी इंग्रजीत संवाद साधून कर न भरण्याविषयी काही याचना करू शकेल, अशी अपेक्षा त्यांनी बाळगली..





पण पाद्रीसुद्धा सरकारच्या निर्णयापुढे हतबल होते. त्यांनी शेतकऱ्यांना कर भरून आपली शेते वाचवावीत, असे सुचवले. कर भरण्यासाठी लोकांना पैश्याची मदत करावी, अशी पाद्रीची तीव्र इच्छा होती; पण ते स्वतःच खूप गरीब होते.



शेतमजूर लोकांना खूप काळजी वाटू लागली. त्यांना भयही वाटू लागले. काय करावे? त्यांना काही समजेनासे झाले.

मग युमामध्ये कंत्राटदारांच्या फेऱ्या सुरू झाल्या. कॅलिफोर्नियातील मोठ्या शेतांवर काम करण्यासाठी त्यांना मजुरांची आवश्यकता होती. त्यांनी गरीब मजुरांना लालूच दाखवली की कॅलिफोर्नियातील शेतांवर कापूस, फळे, भाज्या या पिकांची तोडणी केल्यास भरपूर कमाई करता येईल.

सीझरच्या आईवडिलांनी याबाबत आपापसांत चर्चा केली. युमामध्ये काही काम मिळणार नाही, हे त्यांना पक्के ठाऊक होते. त्यामुळे त्यांनी कॅलिफोर्नियाला जाण्याचा निर्णय घेतला.



भर उन्हाळ्यात एके दिवशी त्यांनी आपली भांडी-कुंडी पोत्यात भरली, बाड-बिस्तरा गुंडाळला, काही गरजेच्या वस्तू सोबत घेतल्या. मिसेस चावेझने स्वत:च्या हातांनी सुंदर कलाकुसर केलेले एक कापड काळजीपूर्वक सामानाच्या पेटीत ठेवले. हे सगळे सामान त्यांनी आपल्या जुन्यापुराण्या स्टुडबेकर मोटारगाडीच्या छतावर बांधून ठेवले.



यानंतर सीझरचे आईवडील आणि सहा मुले गाडीत बसले. ते पश्चिम दिशेत असलेल्या कोलोरॅडो नदीपुलाकडे निघाले. हा पूल त्यांच्या घरापासून काही मैल अंतरावरच होता. पूल पार केल्यावर ते कॅलिफोर्नियातील इम्पीरियल व्हॅलीमध्ये प्रवेश करणार होते.

त्यांच्या गाडीच्या पुढे-मागेही तशाच जुन्या गाड्या होत्या. या गाड्याही सामान आणि मुलांनी खचाखच भरल्या होत्या. सगळे लोक एक साधे, सरळ आयुष्य जगण्याची उमेद बाळगत एका नवीन राज्याच्या दिशेने चालले.



चावेझ कुटुंब एकीकडे घर सोडून जात असल्याबद्दल दुःखी होते तर दुसरीकडे एका नवीन आयुष्याला सुरुवात करत असल्याबद्दल उत्साही होते. तिथे बऱ्यापैकी पैसा कमावता येईल, मग त्यांच्या मुलांना शेतावर काम करावे लागणार नाही, ते शाळेत जाऊ शकतील, इंग्रजी लिहू-वाचू शकतील अशी आशा सीझरच्या आईवडिलांना होती.

सीझर खूप लहान आणि बारीक होता. त्याच्या अंगातील जुना शर्ट पूर्णपणे फाटला होता. सीझरच्या भावाच्या, रिचर्डच्या पायात चपला नव्हत्या.



गाडीत छोट्याशा जागेत बसून सीझर स्वप्ने रंगवू लागला, “मीसुद्धा काम करेन, आम्ही दोघे भाऊ मिळून काम करू, खूप पैसा कमवू, आमच्यासाठी चपला आणि शर्ट विकत घेऊ.”

प्रवास संपला. तो कुटुंबकबिला कंत्राटदाराने सांगितलेल्या मोठ्या शेतावर पोहोचला. निवाऱ्यासाठी त्यांनी शेताच्या सभोवार नजर फिरवली. काही झोपड्या दिसल्या त्यांना, पत्र्यांच्या भिंतीं असलेल्या. प्रत्येक झोपडीत केवळ एकच खोली होती. संपूर्ण कुटुंबाला राहाण्यासाठी या झोपड्या सोयीस्कर नव्हत्या.

मग ते एका झोपडीच्या आत गेले. आत भट्टीसारखा उष्मा जाणवला. बाथरूम, पाणी या सुविधा झोपडीत नव्हत्या. फक्त स्वयंपाकासाठी एक गॅसचा स्टोव्ह तिथे होता.

थकलेले-भागलेले, काळजीने खंगलेले ते सर्व गाडीत परतले. काय करावे, या विचारात पडले. पण त्याचवेळी इतर काही कुटुंबे पुढे आली आणि आपले सामान झोपड्यांमध्ये ठेवू लागली.





अखेरीस मिस्टर चावेझनी मोटरगाडीवरून आपले सामान उतरवले. मिसेस चावेझने आपली भांडी-कुंडी एका झोपडीत ठेवली. सीझरने बाहेर आवारात असलेल्या नळाचे पाणी बादलीत भरून आणले.

सूर्यास्तानंतर त्यांनी सोबत आणलेले पण थंड झालेले अन्न खाल्ले. मग तापलेल्या जमिनीवर बिछाना घातला. जुन्या घराच्या आठवणी काढत, भविष्याची चिंता करत त्यांनी झोपण्याचा प्रयत्न केला.

स्थलांतरित मजुरांसोबत सीझरच्या आयुष्याची ही सुरुवात होती. जसजसा काळ सरत गेला तसतसे या मजुरांची अवस्था सुधारण्याऐवजी अधिकाधिक बिघडत गेली. अनेक मजुरांना पूर्ण दिवस वाकून काम करावे लागे. त्यांची पाठ दुखून येत असे. त्यांच्या पाठीचा बाक कायम वाकलेला राहात असे. त्यामुळे या मजुरांना “वाकलेले मजूर” असे नाव पडले. हे मजूर कामाच्या ओझ्याने नेहमी थकलेले दिसत.



मजूर शेतात पिकलेली भाजी, फळे, कापूस यांची तोडणी होईपर्यंतच त्या शेतावर राहात. त्यांना कामाचा पूर्ण मोबदला कधीच मिळत नसे. पण इंग्रजी भाषा बोलता येत नसल्यामुळे ते तक्रारही करू शकत नसत.

मिळालेला मोबदला घेऊन कंत्राटदाराच्या हुकूमानुसार ते दुसऱ्या शेतावर जात. अशा तऱ्हेने ते कामासाठी कॅलिफोर्नियाच्या मध्यभागातील सॅन जॉक्विन व्हॅलीपर्यंत प्रवास करत गेले आणि पुन्हा तिथून परतले. जिथेजिथे पिकांच्या कापणीसाठी मजुरांची गरज होती तिथेतिथे वस्ती करून त्यांनी ते काम केले.

कधीकधी पीक भरघोस आले नाही तर मजुरांना पोट भरण्याएवढी कमाई होत नसे. मग आपल्या मोटरगाडीसाठी ते पेट्रोलही खरेदी करू शकत नसत. कधीकधी एखाद्या शेतात झोपण्यासाठी त्यांना झोपडी मिळत नसे. मग मजूर आपल्या गाडीमध्ये किंवा एखाद्या तंबूमध्ये झोपत.

एका पावसाळी थंडीच्या दिवसांत सीझरचे कुटुंब एका पुलाखाली राहिले. पिकांची कापणी झाल्यानंतर त्यांना इतके कमी पैसे मिळाले होते की ते आपल्या गाडीमध्ये पेट्रोल भरू शकले नाहीत. त्यांनी ॲरिझोनात राहाणाऱ्या आपल्या नातेवाईकांकडे मदत मागितली. इतर मजूर ते ठिकाण सोडून निघून गेले तेव्हा शेतमालकाने तेथील वीजपुरवठाही बंद केला. भयभीत अवस्थेत, भुकेल्या पोटाने त्यांनी तिथेच कित्येक दिवस काढले. नातेवाईकांकडून पैसे पोहोचल्यावरच ते लॉस एंजेल्सला जाऊ शकले.



लॉस एंजेल्सला जाताना मिसेस चावेझने मोटरगाडी थांबवली. तिने स्वतःच्या हातांनी सुंदर कलाकुसर केलेले कापड पेटीतून काढले. रस्त्यावरून जाणाऱ्या एका माणसाला ते कापड विकले. त्या पैश्यातून तिने अन्न खरेदी केले, गाडीत पेट्रोल भरून घेतले.

हिवाळ्यात स्थलांतरित मजुरांना खूप कमी काम मिळत असे. या काळात चावेझ पती-पत्नी एकाच ठिकाणी बस्तान बसवू पाहात. यामुळे त्यांची मुले नियमित शाळेत जाऊ शकत. पोट भरण्यासाठी पती-पत्नी छोटीमोठी कामे करत. पण काही आठवड्यांनी किंवा महिन्यांनी कामाच्या शोधात त्यांना पुन्हा ठिकठिकाणी भटकावे लागे.

अशा भटकंतीमुळे आठवी इयत्ता उत्तीर्ण होईपर्यंत सीझर तब्बल तीन डझन शाळांमध्ये शिकला. तो आपल्या बाकावर बसून इतरांचे इंग्रजी बोलणे ऐकत असे. यामुळे तो थोडंथोडं इंग्रजी समजू लागला. शाळेचे शिक्षक स्पॅनिश बोलणाऱ्या स्थलांतरित मजुरांच्या मुलांकडे फारसे लक्ष देत नसत. अंगात फाटके कपडे घालून आलेली ही मुले लवकरच ही जागा सोडून दुसरीकडे जातील आणि त्यांच्या जागी तशीच नवीन मुले येतील, हे ते शिक्षक जाणत होते.



वर्गात शिक्षकांनी विचारलेल्या एखाद्या प्रश्नाचे उत्तर देण्याची सीझरला खूप इच्छा होई. पण त्यासाठी हात वर करण्याची त्याला खूप शरम वाटे. वर्गातील मुले आपल्याला हसतील, अशी भीती त्याला वाटे.

सीझर आणि रिचर्ड नेहमी भुकेने कावलेले असत. शाळा संपल्यावर दोघे कालव्यात मासे पकडण्यासाठी जात. हा कालवा नदीतील पाणी शेतात आणत असे. रात्रीच्या जेवणासाठी दोघे कुठूनकुठून हिरव्या भाज्या शोधून आईकडे आणून देत.





एकदा त्यांनी रस्त्याकडेला टाकलेली सिगारेटची जुनी पाकीटे आणि च्युइंग-गमवरील टीनची पातळ आवरणे गोळा केली. टीनच्या आवरणांना सपाट करून ते एक चेंडू बनवू लागले. चेंडू आठ किलोचा झाल्यावर त्यानी तो विकून टाकला. मिळालेल्या पैश्यातून त्यांनी आपल्यासाठी चपला आणि दोन टी-शर्ट खरेदी केले. हा त्यांच्या आयुष्यातील एक आनंदाचा क्षण होता. आठवड्याच्या शेवटी आणि सुट्ट्यांमध्ये मात्र ते आपल्या आईवडिलांसोबत शेतात काम करत.

कॅलिफोर्नियाच्या डोंगर-कपाऱ्यांतील फिकट वर्णाच्या बिगरमेक्सिकन लोकांना 'अँग्लो' म्हणत. सीझर या अँग्लो मजुरांशी इंग्रजीतून बोलत असे. त्यांच्याकडून सीझरला वेगवेगळ्या शेतांबद्दल आणि त्यांच्या मालकांबद्दल नवनवीन गोष्टी कळल्या. कोणत्या शेतांवर आपल्याला चांगली मजुरी मिळेल, आपण फसवले जाणार नाही, कुठे राहाण्यासाठी चांगली घरे नाहीत अशी सगळी माहिती त्याने गोळा केली.

सीझरने ही माहिती आपल्या आईवडिलांना दिली. इतर मेक्सिकन-अमेरिकन मजूर आणि मेक्सिकोतून आलेल्या नवीन कुटुंबांनाही त्याने ही माहिती कळवली. आपल्या कुटुंबाला भोगावा लागलेला त्रास इतर लोकांनाही भोगावा लागू नये, अशी त्याची प्रामाणिक इच्छा होती.

चावेझ कुटुंब इथेतिथे भटकंती करून थकले होते. शेवटी कॅलिफोर्नियातील सॅन होजे या शहरात एका मोडकळीस आलेल्या झोपडीत जाऊन ते वसले. तिथे आसपास काही मोठी शेते होती. या शेतांत त्यांना नेहमी काम मिळत असे. सीझर थोडा मोठा झाल्यावर आपल्या कुटुंबाला सोडून निघून गेला आणि अशाच एका शेतावर नोकरी करू लागला.

सीझरला द्राक्षाच्या मळ्यामध्ये काम करायला जास्त आवडत असे. वसंत ऋतूत द्राक्षांच्या वेलींच्या लांबलचक रांगांमधून चालण्याचा, वेलींना फुटणारी पाने बघण्याचा त्याला छंद जडला. उन्हाळ्यात वेलींवर तयार होणारे द्राक्षाचे घड आणि त्यात पिकणारी द्राक्षे बघण्यात त्याचा वेळ छान जात असे.

मळ्यातील काम एक प्रकारे कष्टप्रद होते. द्राक्षांनी लगडलेल्या वेलींखाली असंख्य काळे किडे सीझरच्या चेहऱ्यावरून आणि हातावरून फिरत राहात. तेथील हवेत श्वास गुदमरून जात असे. खूप काळ वाकून काम केल्यामुळे पाठ दुखून येत असे.

पण द्राक्षाच्या मळ्यात वर्षभर काही ना काही काम निघत असे. मजुरांना एका शेतावरून दुसऱ्या शेतावर भटकावे लागत नसे. सीझर इतर मजुरांसारखंच मोडकळीस आलेल्या इमारतीतील घरात राहात असे. तिथेच त्यांच्यासोबत जेवत असे. हळूहळू तो द्राक्षाच्या वेली छाटण्यात आणि द्राक्षे तोडण्यात पटाईत झाला. एखाद्या नवशिक्या माणसाला मुश्किल वाटणारे हे काम आपण सराईतपणे करतो, याचा त्याला अभिमान वाटत असे.

सीझर आपल्या बालपणी अनुभवलेली गरीबी कधीच विसरू शकला नाही. बऱ्याच मजुरांची मोठी कुटुंबे आपल्या चिल्ल्या-पिल्ल्यांसोबत अजूनही त्याच कोंदट झोपड्यांमध्ये राहातात, हे त्याला माहित होते.

आपण मालकाकडून राहाण्यास चांगले घर आणि जास्त वेतन मागू, असे त्याने इतर मजुरांना सुचवले. पण बहुतेक मजुरांना भय होते की आपण मागण्या केल्या तर मालक कामावरून काढून टाकेल. मग आपल्या कुटुंबाचे पोट कसे भरायचे?

या काळात कॅलिफोर्नियातील डेलॅनो शहरात सीझरचा हेलन फेबेलाशी परिचय झाला. सीझर जे काही करतोय त्यात मजुरांचे हित आहे, याची हेलनला खात्री होती. सीझरचे हेलनवर प्रेम बसले. त्याला तिच्याशी लग्न करावेसे वाटू लागले.

याच वेळी दुसरे महायुद्ध सुरू झाले. सीझर नौदलात भरती झाला. आपण देशाच्या कामी येतोय, याचा त्याला अभिमान होता.

एकदा सुट्टीवर असताना सीझर हेलनला भेटण्यास डेलॅनोत आला. तिला घेऊन तो सिनेमा पाहाण्यास गेला. सीटवर बसल्यावर थिएटर कर्मचाऱ्याने ती सीट ‘अँग्लो’ लोकांसाठी राखून ठेवलेली असल्याचे त्याला सांगितले. कर्मचाऱ्याने सीझरला मेक्सिकन-अमेरिकन लोकांसाठी असलेल्या सीटवर जाऊन बसण्यास सांगितले. सीझरचा स्वभाव तसा रागीट नव्हता. पण कर्मचाऱ्याच्या वर्तनाचा त्याला खूप राग आला. सीझरने त्याला विरोध केला आणि सीट बदलण्यास नकार दिला. आपण अमेरिकेच्या नौदलात काम करतो त्यामुळे आपण अमेरिकनच आहोत, असे त्याने ठासून सांगितले.

शेवटी सीझर आणि हेलन यांना थिएटरमधून बाहेर जाण्यास सांगण्यात आले.

हेलनसोबत थिएटरबाहेर पडताना सीझरने मनाशी ठाम निश्चय केला, “महायुद्ध समाप्त झाल्यावर आपल्या लोकांना आदर आणि न्याय मिळवून देण्यासाठी अहोरात्र झटायचे.”

युद्ध समाप्तीनंतर सीझरने हेलनशी लग्न केले. काही काळ त्याने सॅन होजे शहरानजिक एका शेतावर जर्दाळू तोडणीचे काम केले. या कामासाठी त्याला फार कमी मजुरी मिळे.



जास्त मजुरीची मागणी करण्यासाठी सीझरने मजुरांना एकत्र केले. पण बऱ्याच मजुरांना त्यांच्या मालकांचे भय वाटत होते. जे मेक्सिकन मजूर अद्याप अमेरिकेचे नागरिक बनले नव्हते ते मजूर आपल्याला पुन्हा मेक्सिकोत पाठवतील म्हणून घाबरत होते. मेक्सिकोमध्ये कॅलिफोर्नियापेक्षाही खडतर आयुष्य होते आणि ते मजुरांना नको होते.

मग सीझरने मेक्सिकन मजुरांसाठी इंग्रजी भाषेचे वर्ग सुरू केले. या वर्गात मजूर इंग्रजी लिहा-वाचायला शिकू लागले. अमेरिकन नागरिक बनण्यासाठी इंग्रजीची परीक्षा द्यावी लागे. त्यात आपले मजूर उत्तीर्ण व्हावेत, अशी सीझरची इच्छा होती. यामुळे मजुरांना मेक्सिकोत परत पाठवतील, या भीतीचे कारणच उरणार नाही, असे त्याला वाटले.

एकदा फ्रेड रॉस नावाचा एक अँग्लो सॅन होजे शहरात आला. त्याने सीझरच्या कामाविषयी ऐकले. त्याला सीझरची भेट घ्यावीशी वाटू लागली. पण यापूर्वी अनेक अँग्लो माणसांकडून सीझरची फसवणूक झाली होती. तो अँग्लो माणसावर सहजासहजी विश्वास ठेवू शकत नव्हता. त्यामुळे तो बराच काळ फ्रेड रॉसला टाळत राहीला.

शेवटी दोघांची भेट झाली. फ्रेड मजुरांची मदत करू इच्छितो, हे कळल्यावर सीझर आश्चर्यचकीत झाला. फ्रेडलाही आपल्यासारखीच मजुरांविषयी तळमत वाटते, हे सीझरने पाहिले. आपण *कम्युनिटी सर्व्हिस ऑर्गनायझेशन* या संस्थेचे संघटक असल्याचे फ्रेडने त्याला सांगितले.

सीझरच्या अंगात उत्साह संचारला. फ्रेड रॉसने त्याला *कम्युनिटी सर्व्हिस ऑर्गनायझेशन* साठी काम करण्यास सुचवले. सीझर एका पायावर तयार झाला.

दिवसा सीझर जर्दाळूंची तोडणी करत असे. रात्री अमेरिकन नागरिक बनलेल्या मेक्सिकन-अमेरिकन मजुरांना तो एकत्र करत असे. निवडणुकीसाठी मतदार म्हणून नोंदणी करावी यासाठी तो मजुरांचे मन वळवत असे. यामुळे इतर अमेरिकन लोकांसारखे त्यांनाही मतदान करता आले असते. सीझरच्या या प्रयत्नातून दोनच महिन्यात चार हजारपेक्षाही जास्त मजुरांनी मतदार म्हणून नोंदणी केली.



सीझर जे काही करत होता ते शेतमालकांच्या लक्षात यायला वेळ लागला नाही. हा माणूस मजुरांना बंड करण्यासाठी चिथावणी देईल, अशी भीती त्यांना वाटू लागली. म्हणून, त्यांनी सीझरला कामावरून काढून टाकले.

मग सीझर पूर्ण वेळ *कम्युनिटी सर्व्हिस ऑर्गनायझेशन* साठी काम करू लागला. या नोकरीमध्ये त्याला महिन्याकाठी गरजेपेक्षा जास्त वेतन मिळत होते. एवढा पैसा त्याने आयुष्यात कधी पाहिला नव्हता. पण या पैशापेक्षा त्याला आपल्या कामात जास्त रस होता.

संस्थेत मीटिंग आयोजित करणे, हे सीझरचे मुख्य काम होते. आपल्याला हे काम जमेल की नाही, याची त्याला सतत चिंता वाटत असे. मिटिंगचे नेतृत्व कसे करायचे, कसे बोलायचे हे त्याला कळायचे नाही. मग त्याने या गोष्टीचा सराव सुरू केला. मीटिंगमधील इतर लोक काय बोलतात, कसे बोलतात याकडे तो बारकाईने लक्ष पुरवू लागला.

हळूहळू मजूर आपले बोलणे लक्ष देऊन ऐकतात, हे सीझरला जाणवले. सीझर आपले प्रश्न ऐकून घेतो, समजून घेतो असा विश्वास वाटल्यामुळे मजूरांमध्ये तो लोकप्रिय झाला.

एक एक करून मजूर संघटनेत सामील होण्यास तयार झाले. हे एक अत्यंत कठीण काम होते. पण आंदोलन केले तर आपल्यालासुद्धा सीझरसारखंच नोकरीवरून काढून टाकतील, याची भीती मजुरांना सतत वाटत असे.

मेक्सिकन मजूरांना इंग्रजी शिकण्यासाठी तयार करणेही खूप अवघड होते. मजूर वर्गावर येऊ म्हणत आणि घरीच पडून राहात. कधीकधी सीझर कठोर होई आणि 'भेकड' म्हणून त्यांची निंदा करे.

सीझर मजुरांच्या नकारात्मक प्रतिसादाला कंटाळला. मार्च 1962 मध्ये त्याने *कम्युनिटी सर्व्हिस ऑर्गनायझेशन* सोडून दिली. आता सीझर आणि हेलन यांना स्वत:ची मुलं होती. ते डेलॅनोमध्ये परतले. तिथे त्यांनी एक लहानसे घर भाड्याने घेतले. हे घर शहराच्या पश्चिम भागात होते. तिथे इतरही मेक्सिकन-अमेरिकन मजूर राहात होते. अँग्लो लोक शहराच्या पूर्व भागात राहात होते.



सीझर आणि हेलन यांनी 1200 डॉलर साठवले होते. त्यांनी डेलॅनोनजिकच्या सॅन जॉक्विन व्हॅलीतील शेतमजुरांना संघटीत करण्याचे ठरवले. आपल्या कुटुंबाचे पोट भरता यावे, म्हणून हेलन शेतात काम करू लागली. काही वेळा सीझरनेही खड्डे खोदण्याचे काम केले.

त्यांनी आपल्या नव्या संघटनेचे नाव ठेवले, *नॅशनल फार्म वर्कर्स असोसिएशन (NFWA).*



सहा महिने सीझर स्थलांतरित मजुरांच्या वेगवेगळ्या वस्त्यांवर गेला. प्रत्येक वस्तीवर त्याला काही उत्साही मजूर भेटले. हे मजूर सीझरच्या नव्या संघटनेत सामील झाले.

संघटनेत तीनशे मजूर सामील झाल्यावर सीझरने त्यांची एक मीटिंग घेतली. सीझर आणि त्याचा चुलत भाऊ मॅन्युअल यांनी एक झेंडा तयार केला होता. लाल रंगाच्या या झेंड्यावर पांढऱ्या वर्तुळात एक काळ्या रंगाच्या गरुड पक्ष्याचे चित्र होते. सीझरने हा झेंडा सर्व मजुरांना दाखवला. मजुरांनी या झेंड्याला पसंती दर्शवली.

मग सीझरने प्रत्येक मजुराला देणगी देण्याचे आवाहन केले. त्याने स्पष्ट केले की अडीअडचणीत देणगीची रक्कम मजुरांनाच उपयोगी पडेल. त्यातून मजुरांसाठी औषधे, वाणसामान यांची दुकाने, पेट्रोल भरण्याचे स्टेशन सुरू करता येईल. तिथे मजुरांना गरजेच्या वस्तू स्वस्त दरात मिळतील. ज्या मजुरांची मालकाकडून फसवणूक झाली आहे त्यांना या रकमेतून वकिलाची मदत घेता येईल. गरजेच्या वेळी संघटना मजुरांना पैशाचीही मदत करू शकेल.

सर्व मजुरांनी सीझरच्या योजनेचे टाळ्या वाजवून स्वागत केले. या मीटिंगनंतर आणखीही बरेच मजूर संघटनेचे सदस्य बनले.

पुढच्या तीनच वर्षांत सीझरने आपले वचन पूर्ण केले. त्याचबरोबर त्याने मजुरांसाठी इतरही काही योजना बनवल्या.

सीझरला दुकानांतील आणि कारखान्यांतील कामगारांच्या सुरक्षेसाठी असणाऱ्या कायद्यांची माहिती होती. या कायद्यानुसार, कामगारांना नियमित वेतन मिळायला हवे तसेच त्यांच्या कामाचा परिसर स्वच्छ आणि सुरक्षित असायला हवा.

पण शेतात काम करणाऱ्या मजुरांसाठी असा कुठला कायदा नव्हता. मालक मजुरांना कमीतकमी वेतनात राबवून घेई. ते मजुरांकडून कित्येक तास विश्रांतिशिवाय सलग काम करवून घेत. मजुरांना राहाण्यासाठी स्वच्छ जागेची सोयही मालक करत नसत.

सीझरने ही परिस्थिती बदलण्याचा निश्चय केला. NFWA संघटनेची ताकद वाढली तेव्हा मजुरांनी अन्य क्षेत्रातील कामगारांना मिळतात तशा सुविधांची मागणी करावी, असे सीझरने सुचवले.

पण 1965 साली द्राक्षतोडणी करणाऱ्या काही मजूरांचा संयम संपला. हे मजूर NFWAचे सदस्य नव्हते. सुगीच्या दिवसांत ते जास्त कमाई करू इच्छित होते. नंतर हिवाळ्यात काही काम मिळणार नाही, याची त्यांना भीती होती.




तोवर मोठे 'काम बंद' आंदोलन करण्याइतपत सीझरची तयारी नव्हती. त्याच्याकडे फार कमी पैसे शिल्लक होते. आंदोलनादरम्यान मजुरांना पोटाची भूक भागवण्यासाठी पैश्याची गरज पडणार होती. पण संघटनेच्या सदस्यांनीही आंदोलनात सामील होण्यासाठी सीझरवर दबाव आणला. अखेरीस सीझरने मान्य केले. त्यानंतर NFWA चे सदस्यसुद्धा मळ्याजवळ उभे राहून "हेल्गा! हेल्गा!" असे ओरडू लागले.

कित्येक आठवडे मालक आणि मजूर यांच्यात ताण-तणाव राहिला. शेवटी दोन मळ्यांच्या मालकांनी मजुरांचे वेतन वाढवण्याचे मान्य केले. यानंतर संपावर गेलेले मजूर पुन्हा आपल्या कामावर परतले.

मग एका मोठ्या मळ्यातील मजुरांनी आंदोलन सुरू केले. यावेळी मजुरांनी सीझर चावेझला त्यांचा प्रतिनिधी म्हणून बोलण्यासाठी पुढे केले. मालकाने चर्चेला नकार दिला. त्याऐवजी त्याने मेक्सिकोतून ट्रक भरून नवीन मजूर आणले.

या मेक्सिकन मजुरांना आंदोलनाबाबत काहीच माहित नव्हते. त्यांना इंग्रजी भाषाही समजत नव्हती. त्यांनी जेव्हा “हेल्गा” हा शब्द ऐकला तेव्हा कुठे त्यांना परिस्थितीची कल्पना आली. यानंतर हे आंदोलन पुढे अनेक दिवस सुरू राहिले.

तोपर्यंत सीझरचे नाव देशभर प्रसिद्ध झाले. वृत्तपत्रांमध्ये आणि मासिकांमध्ये त्याच्याबद्दल छापून आले.

सीझरच्या आंदोलनाबद्दल वाचून अनेकांना त्याची बाजू पटली. धर्मोपदेशक, पाद्री, शिक्षक, विद्यार्थी आणि इतर अनेक लोक सीझरला मदत करण्यास डेलॅनोला पोहोचले. यांतील काहींनी लोकांच्या पत्रांची उत्तरे देण्याचे काम केले, काहींनी दुकानांत काम केले, काही मजुरांसाठी अन्नपाणी घेऊन गेले. कित्येक लोकांनी खाद्यपदार्थ, कपडे आणि पैसे पाठवले.

सीझरने या सगळ्यांचे आभार मानले. आंदोलन पुढे सुरू राहिले. दिवसेंदिवस डेलॅनोमध्ये परिस्थिती बिघडत गेली. आंदोलन समाप्त करण्याचा मार्ग सीझरला सापडत नव्हता. .

एके दिवशी सीझरच्या मनात एक विचार चमकून गेला. “मजुरांच्या आंदोलनाला देशभरातून मोठ्या संख्येने लोकांची सहानुभूती मिळाली. मग हेच लोक आंदोलनाला वेगळ्या पद्धतीने मदतही करू शकतील. देशभरातील लोकांनी द्राक्षे खरेदी न करण्याचे, म्हणजे द्राक्षांवर बहिष्कार टाकण्याचे ठरवले तर! तेव्हा कदाचित मळ्यांचे मालक मजुरांसोबत काही तडजोड करायला तयार होतील.”

सीझरने मजुरांची मीटिंग बोलावली. आपला हा नवीन विचार त्याने सर्वांसमोर मांडला. मजुरांना सीझरची ही कल्पना आवडली.

जानेवारी 1968 मध्ये पन्नास मजूर शाळेच्या एका जुनाट बसमधून न्यूयॉर्कला गेले. इतर मजूरही असेच इतर शहरांमध्ये गेले. तिथे त्यांनी दुकानदारांना द्राक्षांची खरेदी-विक्री न करण्याची विनंती केली. त्यांनी लोकांनाही द्राक्षे खरेदी न करण्याचे आवाहन केले.

जिथेजिथे मजूर गेले तिथेतिथे लोकांनी स्वेच्छेने दुकानांसमोर “द्राक्षे खरेदी करू नका” असे लिहिलेले फलक लावले. ट्रक ड्रायव्हरनासुद्धा या आंदोलनाला मदत करण्याची इच्छा झाली. कित्येक ट्रक ड्रायव्हरनी मळ्यातून दुकानांपर्यंत द्राक्षे न्यायला नकार दिला. कित्येकांनी निर्यात करावयाची द्राक्षे बंदरातील जहाजांवर घेऊन जाण्याचे नाकारले.




पुढील वर्षी बहिष्कार आंदोलनाचे लोण साऱ्या देशभर पसरले. सीझरला खूप आनंद झाला. या आंदोलनाद्वारे शेतमजुरांची समस्या देशवासियांसमोर मांडण्याचा एक मार्ग अखेर त्याला सापडला होता.

सीझर आता वयाच्या पन्नाशीत पोहोचला होता. अद्याप त्याच्या काळ्या त्वचेला सुरकुत्या पडल्या नव्हत्या. त्याचे केस अजूनही काळे होते. पण तो थकला होता, अशक्त झाला होता. इतकी वर्षे वाकून काम केल्यामुळे त्याच्या पाठीत खूप वेदना होत असत.

सीझरचे काही मित्र मिळून त्याची काळजी घेऊ लागले. सीझर मीटिंगला जाई तेव्हा त्याचे मित्र त्याला पायऱ्या चढताना-उतरताना आधार देत. त्यांच्यासाठी सीजर एक महत्त्वाची व्यक्ती असल्यामुळे ते या ना त्या प्रकारे त्याची मदत करायला, रक्षण करायला मनापासून तयार असत.

आयुष्यात एवढे दु:ख सहन करूनही, कष्ट आणि संघर्ष करूनही सीझर फारसा बदलला नव्हता. तो द्राक्ष तोडणी करणाऱ्या मजुरांची आस्थेने विचारपूस करत असे. पत्रकारांना बहिष्काराच्या बातम्यांबद्दल विचारत असे. अजूनही तो इतर मजुरांसारखाच आपल्या कुटुंबासोबत एका लहानश्या घरात राहात होता.

शेतमजुरांच्या आयुष्यात झालेल्या सुधारणा बघून सीझरला खूप बरे वाटे. आता मजुरांना पुरेसे वेतन आणि राहायला चांगले घर मिळत होते. दुपारी कामातून विश्रांती घेण्यासाठी वेळ मिळत होता. मजूर खूप आजारी पडला, काम करू शकला नाही तरी त्याचे वेतन कापले जात नव्हते. मजुरांची मुले नियमित शाळेत जाऊ लागली होती.

आता सीझर भविष्याकडे नजर लावून बसला. त्याला खात्री होती की एक ना एक दिवस अमेरिकन काँग्रेस शेतमजुरांना इतर कामगारांसारखे सारे हक्क देईल. एक ना एक दिवस शेतमजुरांचे युनियन लीडर आणि शेतमालक एकत्र बसतील, मजुरांच्या प्रश्नांवर चर्चा करतील, त्यांची समाधानकारक उत्तरे शोधतील. जेव्हा असा दिवस उगवेल तेव्हा शेतमजूर 'दुर्लक्षित अमेरिकन' राहाणार नाहीत, याची सीझरला खात्री वाटत होती.

1993 साली वयाच्या 66व्या वर्षी सीझर चावेझचे निधन झाले.



